अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या पुनर्रचनेसंदर्भात
त्रिसदस्य समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**डिजीटाईज्ड कालबद्ध सेवा वर्ष २०१५**
**नियोजन विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक: संकीर्ण-१०१५/ प्र.क्र.२२९/का.१४२६,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांक : - १६ नोव्हेंबर, २०१५**

**प्रस्तावना :**

विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली कार्यरत असलेल्या अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत राज्यातील विविध शासकीय विभाग / कार्यालयांकडून सांख्यिकी माहिती गोळा करुन तिचे संस्करण करणे व त्यासंदर्भातील अहवाल तयार करणे, राज्यातील सर्व सांख्यिकीय बाबींशी संबंधित तांत्रिक समन्वय राखणे आणि सांख्यिकी प्रणालीचा विकास साधणे ही कार्य पार पाडली जातात तसेच सर्व प्रकारच्या सांख्यिकीय बाबींशी संबंधित तांत्रिक समन्वयासाठी सांख्यिकी संग्रहण अधिनियम, २००८ च्या कलम ३३ खाली करण्यात आलेल्या सांख्यिकी संग्रहण नियम २०११ मधील नियम-३, उप नियम-२ अनुसार अर्थ व सांख्यिकी संचालनालय प्रमुख संस्था (नोडल एजन्सी) घोषित करण्यात आलेले आहे. राज्यातील विविध विभागातून प्राप्त होणारी गुणात्मक व विश्वासार्ह सांख्यिकीय माहिती वेळेत प्राप्त व्हावी या अनुषंगाने सांख्यिकीय प्रणालीचे बळकटीकरण करणे याचे महत्व लक्षात घेता संचालनालयाची संघटनात्मक पुनर्रचना करण्याबाबत मा. मंत्री, वित्त व नियोजन आणि अधिकारी/कर्मचारी संघटनेच्या झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार एक त्रिसदस्य समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

२. संचालनालयाची संघटनात्मक पुनर्रचना करण्यासंदर्भात पुढीलप्रमाणे त्रिसदस्य समिती गठीत करण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव, (वित्तिय सुधारणा) वित्त विभाग, | अध्यक्ष |
| २ | प्रधान सचिव, (साविस) सामान्य प्रशासन विभाग, | सदस्य |
| ३ | श्री. जयंतकुमार बांठिया, माजी मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य | तज्ञ सदस्य |
| ४ | संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र राज्य | सदस्य सचिव |

I) **समितीची कार्यकक्षा:-**

१. संचालनालयाच्या संघटना आराखडयाचे पुर्नविलोकन करणे.
२. बदलत्या काळात संचालनालयाची भूमिका महत्वपूर्ण होणे अपेक्षित असल्याने संघटनात्मक पुनर्रचनेबाबत शिफारस करणे.
३. वरील उद्देश साध्य होण्याच्या दृष्टीने समितीस आवश्यक वाटेल अशा बाबींचा अभ्यास करुन अनुषंगिक शिफारशी करणे.

II) **समितीचा कालावधी:-** समितीने आपला अंतिम अहवाल समिती गठीत करण्याच्या आदेशाच्या दिनांकापासून दोन महिन्यात सादर करावा. अपवादात्मक परिस्थितीत मुदतवाढीची आवश्यकता भासल्यास शासनाची मान्यता आवश्यक राहील.

III) **सदस्यांचे मानधन व प्रवास खर्च:-** अशासकीय सदस्यांना ते ज्या पदावर सेवानिवृत्त झाले असतील त्या पदास नियमानुसार अनुज्ञेय असलेले.

IV) **समितीच्या बैठका:-**समितीच्या अध्यक्षांनी विहित केल्याप्रमाणे बैठक आयोजित करण्यात यावी.

V) वरील समितीच्या कार्यान्वयानासाठी येणारा खर्च संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या मंजूर अनुदानातून भागवावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५१११६१६५२१२०७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्रचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Vasant Shankar Kulkarni

Digitally signed by Vasant Shankar Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Shankar Kulkarni
Date: 2015.11.16 16:53:22 +05'30'

**(वसंत कुळकर्णी)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२) मा. मंत्री/राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव,
३) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
४) मा. प्रधान सचिव, (वित्तिय सुधारणा) वित्त विभाग,
५) मा. प्रधान सचिव, (साविस) सामान्य प्रशासन विभाग,
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
७) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदरहू शासन निर्णय, अध्यक्ष, राजपत्रित/अराजपत्रित अधिकारी/कर्मचारी संघटना, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांच्या निदर्शनास आणून देण्यात यावा,
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / लेखा कोष भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई,
१०) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
११) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई,
१२) कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-८/ वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई,
१३) कार्यासन अधिकारी (का-१४२७), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४) निवडनस्ती- (कार्यासन-१४२६)